**महादयी पाणी तंटा लवादा समोर महाराष्ट्र राज्याची बाजू मांडण्याच्या दृष्टीने शासनाचे तांत्रिक सल्लागार श्री.श्री.ना.हुद्दार यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र. मांडवी - २०११/प्र.क्र. १०८/११/जसंनि
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :१६/१२/२०११

**१. प्रस्तावना :**

महादयी (मांडवी) पाणी तंटा लवादा समोर महाराष्ट्र राज्याची सिंचन विषयक पाण्याच्या मागणी संदर्भातील बाजू आणि या संदर्भातील राज्याचा दावा अधिक प्रकर्षाने मांडण्याकरिता अपेक्षित असलेल्या रु.८३१.२९ लक्ष (रुपये आठ कोटी एकतीस लक्ष एकोणतीस हजार मात्र) खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात यावी. असा निर्णय दि.५.१०.२०११ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आलेला आहे. त्यानुसार जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मांडवी २०११/प्र.क्र.३२७/१० जसंनि, दि.८.११.२०११ अन्वये मांडवी पाणी तंटा लवाद कामकाजासाठीच्या रु.८३१.२९ लक्ष खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. महादयी पाणी तंटा लवादा समोर महाराष्ट्र राज्याची बाजू मांडण्याच्या दृष्टीने लवादाच्या कामकाजाच्या कायदेविषयक बाबी लक्षात घेऊन तांत्रिक सल्ला देण्यासाठी सल्लागारासाठीच्या खर्चाचा अंतर्भाव सदर अंदाजपत्रकात करण्यात आलेला असून श्री.श्री.ना.हुद्दार, निवृत्त सचिव, जलसंपदा विभाग यांची महाराष्ट्र शासनाचे तांत्रिक सल्लागार म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**२. शासन निर्णय :**

**२.१.** महादयी (मांडवी) पाणी तंटा लवादा समोर महाराष्ट्र राज्याची बाजू समर्थपणे मांडण्याच्या दृष्टीने लवादाच्या कामकाजाच्या कायदेविषयक बाबी लक्षात घेऊन तांत्रिक सल्ला देण्यासाठी श्री.श्री.ना.हुद्दार यांची या शासन निर्णयाच्या दिनांका पासून मांडवी पाणी तंटा लवादाचा अंतिम निर्णय होई पर्यंत महाराष्ट्र शासनाचे तांत्रिक सल्लागार (Technical Adviser) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

**२.२.** श्री.श्री.ना.हुद्दार यांना महाराष्ट्र शासनास सल्ला देण्यासाठी दिल्ली येथील कामाकरिता प्रतीदिन रु.७५००/- (रु.सात हजार पाचशे मात्र) इतके मानधन तसेच मुंबई, गोवा व महाराष्ट्रातील अन्य ठिकाणच्या कामाकरिता प्रतिदिन रुपये ६०००/- (रू. सहा हजार मात्र) इतके मानधन अनुज्ञेय राहील. शासनास सल्ला देण्याच्या कामाच्या अनुषंगाने दुरध्वनी, फॅक्स, झेरॉक्स व टंकलेखन यासाठी सल्लागार यांनी केलेला खर्च मानधनात समाविष्ट

राहिल. प्रत्येक महिन्याचे कामाचे दिवस व केलेल्या कामाबाबतची सविस्तर टिप्पणी दर महिन्यास शासनास सादर करणे आवश्यक राहील.

**२.३** प्रवासाच्या दिवसासाठी व सल्ल्यानिमित्त मुख्यालयाबाहेरील मुक्कामातील बिगर कामाच्या दिवसासाठी प्रतिदिन रु.२,८००/- (रु. दोन हजार आठशे मात्र) इतके मानधन अनुज्ञेय राहील.

**२.४** सल्लागारांना शासन निर्देश देईल त्या-त्या वेळेस लवादाशी निगडित कामासाठी उपस्थित रहावे लागेल. कामाच्या दिवसांच्या मानधन अनुज्ञेय असलेल्या दिवसांची प्रत्येक वर्षातील कमाल मर्यादा ४० दिवस इतकी राहील.

**२.५** श्री. श्री.ना.हुद्दार, निवृत्त सचिव सल्लागार यांचे मुख्यालय पुणे हे राहील व दिल्ली, मुंबई, गोवा आणि इतर ठिकाणी आवश्यकतेनुसार त्यांना लवादाच्या कामासाठी उपस्थित रहावे लागेल. हॉटेलमधील निवासाचा प्रत्यक्षात केलेला खर्च प्रतिपूर्तीसाठी अनुज्ञेय राहील. भोजनादी खर्च (Boarding charges) मानधनात अंतर्भूत आहे.

**२.६** जेथे विमान सेवा उपलब्ध असेल तेथे सल्लागारांना इकॉनामी क्लासने विमान प्रवास अनुज्ञेय राहील. त्यासाठी पूर्व अनुमतीची आवश्यकता भासणार नाही. रेल्वेच्या प्रवासासाठी वातानुकूलित प्रथम वर्ग अनुज्ञेय राहील. कामकाजाच्या ठिकाणी, विमानतळ किंवा रेल्वे स्टेशनवर येताना व जाताना कार अथवा भाडयाची वातानुकूलित कार अनुज्ञेय राहील.

**३.** यावरील खर्च खालील लेखाशीर्षावर टाकावा.

मागणी क्र.आय-५, ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे, ८०-सर्वसाधारण,

१९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०७) योजनांतर्गत - राष्ट्रीय कृषि व ग्रामिण विकास बँक (नाबार्ड) अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०७) (०३)- कोंकण पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१-आय-७८८)

**४.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२१६१०४८५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. म. अबनावे )
शासनाचे उप सचिव.

प्रतः-

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे वगळून) व लाक्षेवि यांचे स्वीय सहाय्यक.

मा. मंत्री जलसंपदा (कृ.खो.पा.मं.) यांचे स्वीय सहाय्यक.
मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक.
मा. मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवरबाव, रत्नागिरी.
श्री. .श्री.ना.हुद्दार, निवृत्त सचिव, तांत्रिक सल्लागार, ३ब१/७, न्यु अंजठा एव्हेन्यु
पौड रोड, कृष्णा हॉस्पीटल जवळ, कोथरुड, पुणे – ४११०३८.
कोषागार अधिकारी, पुणे.
कार्यासन जसंनि (संग्रहार्थ).